**प्रशासकीय मान्यता-**
दोडामार्ग,जि.सिंधुदुर्ग येथील दिवाणी न्यायाधीश (क.स्त.) यांच्यासाठी एक निवासस्थान बांधण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन,**
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.सीआरक्यू-३७१०/१४७/प्र.क्र.४८/का-१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,दिनांक:- ४ ऑक्टोबर, २०१०.

पहा :- १) प्रबंधक (निरीक्षण-१), उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यू) ६०९४/२००९,दिनांक -२ फेब्रुवारी,२०१०.
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश,सिंधुदुर्ग यांचे पत्र क्र.एडीएमएन/ २७०२/ २००९, दि.२५.११.२००९.

शासन निर्णय:- दोडामार्ग,जि.सिंधुदुर्ग येथील दिवाणी न्यायाधीश (क.स्त.) यांच्यासाठी एक निवासस्थान बांधण्याच्या रु.१६,१६,२६५/-(रुपये सोळा लक्ष, सोळा हजार, दोनशे पासष्ट फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(रूपये)

| अनुक्रमांक | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | इमारतीचा बांधकाम खर्च | ८,८५,५०० |
| २ | आकस्मिक खर्च (४%) | ३५,४२० |
| ३ | बाहय पाणी पुरवठा व मलनि:सारण (८%) | ७०,८४० |
| ४ | विद्युतीकरण (११ %) | ९७,४०५ |
| ५ | रेन वॉटर हार्वेस्टिंग (१० %) | ८८,५५० |
| ६ | (१० %) वातानुकूलन यंत्रणा,अग्नीशमन यंत्रणा,स्ट्रीट लाईट, वॉटर पंप,सोलर सिस्टीम,विद्युत जोडणी (एमएसइबी कडून) | ८८,५५० |
| ७ | डिझेल जनरेटर | ३,५०,००० |
| | एकूण | १६,१६,२६५ |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.
अ) **"काम सुरु करण्यापूर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबतची खातरजमा करण्यात यावी.**
ब) **" मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मंजूर करुन घेऊनच काम सुरु करावे."**

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-७, ४२१६- गृह निर्माणावरील भांडवली खर्च-०१ शासकीय निवासी इमारती-७००-इतर गृहनिर्माण (एक) न्यायदान-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४.	हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांकः-१४१/इमा-२, दिनांक १३.४.२०१० अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग,शासन निर्णय क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( र. ग. पांचाळ )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

महाप्रबंधक, उच्च न्यायालय,मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण-प्रथम),उच्च न्यायालय (अपिल शाखा),मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश,सिंधुदुर्ग,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक,मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-दोन,नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रत्नागिरी,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,सावंतवाडी,जि.सिंधुदुर्ग,
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, दोडामार्ग,जिल्हा-सिंधुदुर्ग.
जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग,
उप कोषागार अधिकारी,दोडामार्ग,जिल्हा-सिंधुदुर्ग, ,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ,१८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर,मुंबई-३२,
महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
कक्ष अधिकारी, का. ११ व १२,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.